# मृदंगवादन.

## भाग १ ला.



हें पुस्तक


**विश्वनाथ रामचंद्र काळे वकील**


यांनीं

**लोकोपयोगार्थ**

तयार केलें

तें


मुंबईंत "न्याशनल" छापखान्यांत छापिलें.









शके १८०२.

सन १८८०.




**किंमत १२ आणे.**

॥ श्री ॥

श्रीमन्त महाराज

सकलगुणग्रहाक व गायनवादनादिकलाभिज्ञ

# पतंगशाहा राजे साहेब

## संस्थान जव्हार

यांचे सेवेशीं

हा ल्हानसा ग्रंथ

ग्रंथकर्त्यानें सन्मान पूर्वक व महाराजांचे

परवानगीवरून नजर केला असे.

# प्रस्तावना.

संगीतशास्त्राचा जसा उत्कर्ष व्हावा व जशी लोकांस अभिरुचि लागावी तशी जरी अद्याप दृष्टोत्पत्तीस येत नाहीं, तरी विद्वान् लोकांमध्यें ह्या शास्त्राची इतर शास्त्रांहून कमी योग्यता आहे असें नाहीं. आतां संगीताच्या अनभ्युदयास, राजाश्रय नाहीं, लोक द्रव्यहीन होत चालले आहेत इत्याद्यनेक कारणें आहेत. असें जरी आहे तथापि स्वभावतःच जी ही मनोहर कला ती लोकांस आपल्याकडे कशी आकर्षण करणार नाहीं ! सांप्रतकाळीं सतारनामक वाद्याची लोकांस फारच गोडी लागत चालली आहे. पुष्कळ लोकांच्या मतें, गायन व वादन हें गुरुशिवाय ग्रंथाद्वारें कधींही शिकतां येणार नाहीं, असें आहे. हें म्हणणें सर्वथैव सत्य आहे असें नाहीं. कारण, सतुराग व सतुगायनप्रकाश ह्या दोन पुस्तकांच्या साहाय्यानें पुष्कळ लोक सतार वाजविण्यास शिकले आहेत असें आह्मास अनेक विद्वान् लोकांकडून आलेल्या लेखांवरून व सदर्हू पुस्तकांच्या पहिल्या आवृत्तीच्या खपावरून अनुभवास आलें आहे. ह्यावरून पुष्कळ इतर वाद्येंही ग्रंथाद्वारें वाजवितां येतील असें वाटणें हें साहजिक आहे. गायनाचाही प्रकार असाच आहे; ह्मणजे विपुल द्रव्य खर्चून अनेक गायनकलाप्रवीण लोकांस पदरीं बाळगून व इतर विद्वान् लोकांसही आश्रय देऊन कोणीं राजानें अथवा कोट्याधीश सावकारानें मनावर घेतल्यास इंग्रजी गायनाप्रमाणें आपलें गायनही लेखनद्वारा लोकांपुढें

आणतां येईल अशी आमची तर आमच्या **गायनाब्धिसेतु** नामक पुस्तकावरून खात्री आहे.

आमच्या पूर्वोक्त दोन पुस्तकांवरून अभ्यास करणारांस ह्मणजे सतार शिकणारांस तबल्याचे ठेक्याचें फार अगत्य आहे, व त्यांशिवाय पुष्कळ लोकांस तबला किंवा पखवाज वाजविण्याचा शोक असतो; परंतु सुशिक्षक नसल्यामुळें त्यांचा हा शोक पूर्ण होत नाहीं असें जाणून हें महत्प्रयासानें "**मृदंगवादन**" पुस्तक तयार केलें आहे. ह्याचाही उपयोग लोकांस सतारीच्या पुस्तकांप्रमाणें होईल अशी आशा आहे. यांत काय विषय आहे हें येथें सांगणें नलगे. पुस्तकावलोकनानें समजेल.

ज्याच्या कृपेनें हा प्रयत्न शेवटास गेला त्या परम कृपाळू परमेश्वरापुढें मी सदा नम्र आहे.

*

---

* ह्या ठिकाणीं ज्या पुस्तकावर आमची स्वदस्तुरची सही नसून तें कोणाजवळ असल्यास चोरीचें असें समजलें जाईल.

## रा० रा० विश्वनाथ बोवा.

विनंती विशेष तुह्मी आह्माकडे मृदंग वादन पुस्तकाचा पहिला भाग पाठविला तो अंह्मी सर्व वाचुन पाहिला याची रचना फार चांगली जाहाली असून सर्व लोकांस फार उपयोगी आहे असे आमचे मत्त आहे तारीख २४ मे सन १८८०

विनायक सखाराम पराडकर.

श्री

## रा० रा० विश्वनाथ रामचंद्र काळे.

वि० वि० आपले मृदंग वादन पुस्तकाचा पहिला भाग आपण आंह्मा कडे पाठविला तो आंह्मीं सर्व वाचुन पाहिला. अशा प्रकारचीं पुस्तकें आमचे मराठीभाषेत नाहीत तेणें करून फक्त गवई व बजवये लोक याचाचुन इतर जनास गायन वादन या विषयाचे ज्ञान अथवा त्याज बद्दलची माहिती फारच कमी आहे तर ती उणीव आपल्या या स्तुत्य उद्योगानें दूर होणारी आहे. ही अनंदाची गोष्ट आहे एकंदरींत आपलीं पुस्तक रचना व उद्योग हीं दोन्हीं अत्युत्तम लोकोपयागी आहेत या बदल आपले आह्मीं आभार मानितों व सर्व विद्वज्जन व गुणी मंडळी या पुस्तका बद्दल शिफारस करतील.

ता० २३ मे १८८०

भाउबोवा कागवाडकर

अजम मेहरबान विश्वनाथ बोवा साहेब-

बंदगी दिगर मालूम होवे के आप बनाई हुयी मृदंग वादन कीताबकी पाहिली जिल्द हामारे तर्फे आप भेजदीयी सोहामने बखूबी दर्याफकीयी इस कीताबकी जील्द खूब आछी तर्हेसे बनायी हुयी है इस्से सब लेकोका बहुत फायदा हो जायगा ऐसि हामारि दीलजमयी होगयी है तारीख २४मे सन १८८०.

वजीरखा आदमखा गवई | अली हुसेन बीन कार राहाणार
शहर रामपुर ह० व० मुंबई.

## विशेष सूचना-

पखवाजावर दुहेरी चामडें असतें त्या दुहेरी चामड्याच्या भागास किनारा ह्मणतात व त्यास दुसरा शद्ब चाटी असा आहे

ज्या ठिकाणीं किनाऱ्यावर प्रहार करावा ह्मणुन सांगीतलें आहे तो प्रहार बोटानें करते वेळेस दुहेरी चामड्याच्या पुढलें कातड्यावर कांहीं बोटांचा भाग जातो तथापि तो प्रहार नाऱ्यावरच जाहाला असे समजावें.

दी, थु, हे शद्ब दीन, थुन, प्रमाणे वाजवावे.

---

# गत धमार.

## पृष्ठ. २५

**क धी न धी न धा क धी न ती न ता**, असे शद्ब लिहिले गेले आहेत त्या ठिकाणीं **क धी ट धी ट धा क धी ट ती ट ता** असे ह्मणण्याचा व वाजीवण्याचा संप्रदाय आहे

रूपक ताल पृष्ट साहायात लिहिला आहे तो व पृष्ट २३ यांत रूपकतालाची गत लिहिली आहे हा चतस्र जातीचा रूपक ताल आहे व यासच एका ह्मणतात व हल्ली प्रचारात खंडजातिच्या रूपक तालास मात्र रूपक ताल ह्मणतात.

## पंजाबी ठेका पृष्ठ १९.

**त क्क धी धा**, धा, हे अक्षर वाजविताना उजव्या हाताची थाप मारावयाची परंतु तसे न वाजवितां न अक्षरा प्रमाणे किनाऱ्यावर तरजनीने प्रहार करितात व **त क्क धी ना** असे बोल हि तोंडाने ह्मणण्याचा सांप्रदाय आहे.

विनंति.

ह्या पुस्तकांत कांहीं दोष अथवा कोठें फेरफार करणें योग्य आहे असें ह्या कलेंत प्रविण लोकांनी कृपा करून मला कळविल्यास, तसेंच ह्याचा अभ्यास करणारे लोकांस हीकोठें समज पडत नसल्यास आह्मांस लिहिलें असतां पुनरावृत्तींत त्याबद्दल विचारकेला जाईल.तारिख२४मे सन १८८०

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | गत | परण. | अक्षर. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|---|
| १८ | त्रिवट | ,, | ७ | ती | ती |
| १८ | त्रिवट | ,, | १२ | ना<br>— | ना |
| २१ | ख्याल | ,, | १६ | ता<br>— | ता<br>० |
| २१ | कथेची | ,, | ९ | ना<br>— | ना<br>● |
| २४ | दादरा | ,, | १ | धीं | धं<br>— |
| ३१ | ,, | परण | १३ | धा<br>० | धा |
| ३१ | ,, | परण | १० | ता | ता<br>० |
| ३९ | ,, | परण | ९ | ट | ट |

॥ श्रीशंकर ॥

# मृदंगवादन



## भाग पहिला.

### प्रकरण पहिलें.

**मृदंग** ( पखवाज ) हें वाद्य गायनाच्या बरोबर किंवा कोणत्याही वाद्याबरोबर वाजवितात.

मनुष्याच्या कंठांतून अनेक प्रकारचे स्वर निघून जे राग ऐकण्यांत येतात त्यास **गायन** ह्मणतात, तसेंच वाद्यांतून जे स्वर निघतात त्यांस **वादन** ह्मणतात.

प्रथमतः रागाचे स्वर कंठांतून करणें ते ' आ ' या वर्णाच्या उच्चारानें होतात, परंतु त्यांत कोणताही शब्द होत नाहीं, याकरितां संगीतशास्त्रांत सांगितलें आहे कीं, असे स्वर कंठांतून काढतांना मुखानें , 'अनंत हरि' या शब्दांचा उच्चार वारंवार करून राग गात जावा.

रागांचे स्वर गातांना कांहीं दीर्घ व कांहीं ऱ्हस्व स्वर येतात. ते दीर्घ स्वर किती लांबट ह्मणावे, व ऱ्हस्व स्वर किती आखूड ह्मणावे यांचा नियम ह्मणजे वेळ सारखा रहावा.

ह्मणून स्वर ह्मणण्याचे वेळेस, हातानें किंवा कांस्यपात्राच्या दोन लहानशा वाट्या घेऊन त्यानें एकसारखे एकामागून एक ठोके सारख्या अंतरानें टाकीत जावें, यास ताल ह्मणतात.

तालाचा ठोका टाकणें तो, मनुष्याची नाडी उडत असते त्या बरोबर टाकावा. या ठोक्यास एकमात्रा ह्मणतात, असा साधारण नियम आहे.

असे स्वर या उच्चारानें सारख्या तालाच्या ठोक्या बरोबर ह्मणत गेलें पाहिजे अशा गायनास आलाफ ह्मणतात.

परंतु असे सारखे एकामागून एक ठोके टाकून ताल धरिल्यानें एकच प्रकारचा ताल वाजतो, तालाचा विस्तार होत नाहीं. ह्मणून तीन ठोक्यांचा एक, चार ठोक्यांचा एक, पांच ठोक्यांचा एक, असा एकेक ठोका चढवीत पुष्कळ प्रकारचे तालांचा विस्तार करून ह्यांचीं निरनिराळीं नांवें योजिलीं आहेत.

त्यांत मुख्य ताल सात त्यांचीं नांवें:—धृताल, मठताल, रूपकताल, झंपाताल, त्रिपुटताल, आडताल, एक ताल.

या सात तालांस दक्षिण हिंदुस्थानाकडील लोक, आडाचवताला; सुलफाक; रूपकताल, किंवा एक्का; झंपताल; त्रिवट, आधा, तिताला किंवा तिलवाडा; चौताल; एकताला, ह्मणतात.

प्रत्येक तालास पांच जाती आहेत, ह्मणजे सात तालांपैकीं प्रत्येक ताल पांच तऱ्हेनें ठोका टाकून धरितां येतो त्या पांच जातींचीं नांवें; चतस्र, तिस्र, मिश्र, खंड, संकीर्ण मिळून एकंदर पस्तीस ताल होतात.

पस्तीस तालांचें कोष्टक व मात्रांचीं चिन्हें ( निशाण्या )

सात ताल      पांच जाती.

| | चतस्र. | तिस्र. | मिश्र. | खंड. | संकीर्ण |
|---|---|---|---|---|---|
| ध्रुवताल | \|o\|\| | c c c<br>oooo | c c c<br>oooo<br>\|\|\|\| | c cc<br>\|ooo<br>\|\| | c cc<br>८८८८ |
| मठताल | \|o\| | c c<br>ooo | c c<br>ooo<br>\| \| | c c<br>\| o \| | c c<br>८o८ |
| रूपकताल | o\| | c<br>oo | c<br>oo<br>\| | c<br>o \| | cc<br>o८ |
| झंपाताल | \|\|o | c c<br>ooo | c c<br>ooo<br>\|\| | c c<br>\| oo<br>\| | c c<br>८oo |
| त्रिपुटताल | o\|o | c<br>ooo | c<br>ooo<br>\| | c<br>ooo<br>\| | c<br>oo८ |
| आडताल | \|\|oo | c c<br>oooo | c c<br>ooo<br>\|\| | c c<br>oooo<br>\|\| | cc<br>८८oo |
| एकताल | \| | c<br>o | c<br>\| | c<br>o<br>\| | c<br>८ |

वरील खुणा ह्या मात्रांच्या निशाण्या आहेत. मात्रानियम ह्मणजे तोंडानें अंक मोजून हातानें ठोका टाकणें.

वरील पस्तीस तालांत ज्या खुणा लिहिल्या आहेत त्या प्रमाणें तोंडानें अंक मोजून हातानें ताल धरीत गेलें ह्मणजे सुलभ रीतीनें तालाची माहिती होईल.

मनुष्याच्या हाताची नाडी हलते, त्या प्रत्येक हलण्यास एक मात्रा असा साधारण नियम आहे, परंतु जलद ताल धरण्याच्या वेळेस नाडीचे प्रत्येक हलण्याचे वेळेत दोन किंवा चार मात्रा धरून ताल धरितात. तथापि प्रथम नवीन शिकणारानें नाडीचे प्रत्येक हलण्यास एक मात्रा धरून ताल धरावयास शिकावें.

अशा मात्रा सोळा आहेत त्या प्रत्येक मात्रेचें नांव, संज्ञार्थ चिन्ह व संख्या अशीं खालीं लिहिलीं आहेत.

| मात्रांचीं नांवें. | संज्ञार्थ चिन्हें. | मात्रांची संख्या. |
|---|---|---|
| अनद्रुत किंवा विराम | ◡ | एक मात्रा |
| द्रुत | ० | दोन मात्रा |
| द्रुतविराम | ० (विरामचिन्हासह) | तीन मात्रा |
| लघु | । | चार मात्रा |
| लघुविराम | । (विरामचिन्हासह) | पांच मात्रा |
| लघुद्रुत | । (द्रुतचिन्हासह) | साहा मात्रा |
| लघुद्रुतविराम | । (द्रुत व विरामचिन्हासह) | सात मात्रा |
| गुरु | ८ | आठ मात्रा |
| गुरुविराम | ८ (विरामचिन्हासह) | नऊ मात्रा |
| गुरुद्रुत | ८ (द्रुतचिन्हासह) | दहा मात्रा |
| गुरुद्रुतविराम | ८ (द्रुत व विरामचिन्हासह) | अकरा मात्रा |
| प्लुत | ऌ | बारा मात्रा |

| | | |
|---|---|---|
| प्लुतविराम | ल्ऽँ | तेरा मात्रा |
| प्लुत द्रुत | ल्ऽँ | चवदा मात्रा |
| प्लुत द्रुतविराम | ल्ऽँ | पंधरा मात्रा |
| काकपद | + | सोळा मात्रा |

वरील मात्रांच्या खुणा पाहून हाताने ठोका ( टाळी ) वाजवून मोजण्याची रीति.

मात्रांचीं नांवें व त्या मोजण्याची रीति.

विराम, एक मात्रा; मुखानें ' एक ' असें ह्मणतांनाच हातानें ठोका वाजवावा.

द्रुत, दोन मात्रा; मुखानें ' एक ' असें ह्मणतांनाच हातानें ठोका वाजवून 'दोन' असें लागलेंच ह्मणावें.

द्रुतविराम, तीन मात्रा; मुखानें 'एक' असें ह्मणतांनाच ठोका वाजवून ' दोन तीन ' असें लागलेंच तोंडानें ह्मणावें.

लघु, चार मात्रा; मुखानें 'एक' असें ह्मणतांनाच हातानें ठोका वाजवून ' दोन तीन चार ' असें लागलेंच ह्मणावें.

लघुविराम, पांच मात्रा; मुखानें 'एक' असें ह्मणतांनाच ठोका वाजवून लागलेंच तोंडानें 'दोन तीन चार पांच' असें ह्मणावें.

याचप्रमाणें एकेक अंक चढवीत जाऊन, सोळाही मात्रा मोजाव्या. पहिले अंकाला मात्र ठोका वाजवून बाकीचे सोळापर्यंत अंक नुस्ते तोंडानें ह्मणावे.

'एक' या शब्दावर जो ठोका पडतो त्या 'ए' आणि 'क' या दोन अक्षरांपैकीं 'ए' या अक्षरावर ठोका टाकीत जावा.

वर पस्तीस तालांचे कोष्टकांत मात्रांच्या खुणांनीं ताल

दर्शविले आहेत. त्यांत प्रत्येक ताल त्या खुणांवरून हातानें ठोके टाकून कसा धरावा याजविषयीं उदाहरणार्थ दोन तालांचा अर्थ खालीं लिहिला आहे.

# रूपकताल.

## रूपकतालाच्या निशाण्या.

रूपकतालास तीन ठोक्यांचा ताल ह्मणतात. याच्या दोन निशाण्या आहेत, द्रुत व लघु. याचे दोन ठोके सारखे अंतरानें मारून, तिसऱ्या ठोक्याचा वेळ ठोक्याशिवाय जाऊं द्यावा, कारण द्रुत ह्मणजे दोन मात्रा आणि एक ठोका पडतो, व लघु ह्मणजे चार मात्रा आणि ठोका एकच पडतो तेव्हां दोन आणि चार अशा साहा मात्रा मिळून ठोके दोनच पडतात ते असे:– ‘ एक दोन ’ ‘ एक दोन तीन चार ’ असे पुन: पुन्हा अंक मोजीत जाऊन ‘ ए ’ या अक्षरावर ठोके मारीत गेलें ह्मणजे रूपकताल होतो.

असे साहा अंक मोजीत गेलें ह्मणजे त्यास एक **आवर्त** ह्मणतात.

ज्या अक्षराबरोबर तालाचा ठोका पडावयाचा असतो त्या अक्षराखालीं अशी–आडव्या रेघेची निशाणी असते.

रूपकताल हा तीन ठोक्यांचा ताल असून ठोके तर दोनच टाकावे, असें लिहिलें आहे याचें कारण असें कीं, जर या तीन ठोक्यांच्या तालाच्या तीन निशाण्या केल्या असत्या

तर तिन्ही ठोके सारखे एक दोन एक दोन एक दोन असे वरचेवर पडत गेले असते, मग हा तीन ठोक्यांचा ताल आहे असें समजतां आलें नसतें. याजकरितां द्रुत आणि लघु अशा दोन निशाण्यांची योजना केली आहे. यांत दोन ठोके सारखे वाजवून तिसऱ्या ठोक्याचा अवकाश सोडावा ह्मणजे हा तीन ठोक्यांचा ताल आहे असें समजतें.

कोणताही ताल कितीही ठोक्यांचा असला तरी त्यांत कांहीं ठोक्यांचा अवकाश जाऊं दिल्या खेरीज अमुक ठोक्यांचा ताल आहे हें समजण्यांत येणार नाहीं. जो अवकाश सोडणें तो ठोका गणला पाहिजे. विसावा देणें हें अमुक ताल आहे असें समजण्याची खूण आहे.

जितक्या ठोक्यांचा ताल असेल तितके ठोके विसाव्या सुद्धां धरीत गेलें ह्मणजे त्यास एक आवर्त ह्मणतात.

## चतस्रजातीचा त्रिपुट.

याच्या खुणा तीन आहेत ००। या तालास चार ठोक्यांचा ताल असें ह्मणतात. याचे तीन ठोके सारख्या अंतरानें वाजवून एक ठोक्याचा अवकाश जाऊं द्यावा. या ठिकाणीं एक आवर्त झाला असें समजावें. पुनः तीन ठोके वाजवून एक ठोक्याचा अवकाश जाऊं द्यावा. असें पुनः पुनः ठोके वाजवून विसावा सोडीत गेलें ह्मणजे या तालास चतस्र जातीचा त्रिपुट ह्मणतात. यासच दक्षिण हिंदुस्थानाकडील लोक त्रिवट ह्मणतात. आणि या तालाची सम तीन ठोक्यांपैकीं मधल्या ठोक्यावर ठेविली आहे. परंतु पाहिजे

त्या ठोक्यावर सम ठेविली तरी चिंता नाहीं.

## सम ( अवसान )

प्रत्येक तालाचे कोणत्या तरी एका ठोक्यावर त्या तालाचें मुख्य स्थान ठेवितात कारण गाणारा आणि मृदंग वाजविणारा या दोघांचा मिलाफ कोणत्याही तालाचे मुख्य ठोक्यावर होतो. गाणारा जी कविता गात असतो त्यांतील एखादें अक्षर मुख्य करून तें अक्षर तालाच्या मुख्य ठोक्याबरोबर आणि तो आणि मृदंग वाजविणारा त्याच ठोक्याबरोबर मृदंगावर थाप टाकितो ह्मणजे ऐकणारे त्या ठिकाणीं मान डोलवितात. याच मुख्य ठिकाणास सम अथवा अवसान असें ह्मणतात.

# प्रकरण दुसरें.

तालाच्या बरोबर अनेक प्रकारचे ध्वनि निघावे आणि गाणाराचे स्वरांशीं मिळून स्वरांची भरती व्हावी ह्मणून मृदंग या नांवाचें वाद्य योजिलें आहे. यास विष्णुवाद्य ह्मणतात व हल्लीं प्रचारांत पखवाज ह्मणतात.

## पखवाजाचें वर्णन.

पखवाज हा लांबट वर्तुलाकार लांकडाचा तुकडा सुमारें दाहा तसू पासून तीस तसू पर्यंत लांब व दोन्ही तोंडाला

दाहा इंच पासून पंधरा इंच पर्यंत रुंद असून मध्यभागीं दोन तीन इंच जास्ती जाडीचा असतो व आंतून इतका पोखरलेला असतो कीं तें लाकूड अर्ध इंच जाडीचें बाकी ठेवितात. पहा, नकाशा ( १ )

याचें लांकूड शिसम, खैर, साग, हेदू, सोनचाफा इतक्यांतून बहुतकरून असतें.

पखवाजाचीं दोन्ही तोंडें कातड्यानें मढिवलेलीं असतात व दोन्ही तोंडांचे किनाऱ्यांवर अर्ध इंच किंवा पाऊण इंच दुहेरी चामडें असतें. पहा, ( २ )

पखवाजाच्या दोन्ही तोंडांच्या काठांबरोबर चामड्याच्या वादीचा वेठ वळून घातलेला असतो. त्यास महालु किंवा गजरा ह्मणतात. त्या गजऱ्याशीं तोंडाकडील कातडीं शिवलेलीं असतात. दोन्ही तोंडांच्या गजऱ्यांतून सभोंवतीं वादी ओवलेली असते व पखवाजाचे मध्यभगीं त्या वादींतून लाकडाचे तुकडे दीड इंच जाडीचे. असून सुमारें तीन इंच लांबट वर्तुळाकार घेतलेले असतात त्यास गट्टे ह्मणतात हे गट्टे खालीं व वर ठोकले ह्मणजे पखवाजाचा स्वर चढितां उतरतां येतो. पहा, ( ३ )

मृदंगाच्या एका तोंडाला मध्यभागीं दोन इंच पासून तीन इंच पर्यंत शाई घातलेली असते. पहा, ( ४ )

ही शाई लोहकीट ( लोखंडाची जळ ) बारीक करून गव्हाचे पिठाची चिकी करून त्यांत घोटलेली असते दुसऱ्या तोंडाला वाजिवण्याचे वेळेस गव्हाचें पीठ भिजवून शाईप्रमाणें लावितात.

पखवाजाची दुसरी प्रत तबला ह्मणून पखवाजाचेच दोन

भाग निरनिराळे केलेले असतात. शाईकडचा भाग लाकडाचा असतो व दुसरा भाग लाकडाचा किंवा मातीचा किंवा तांब्याचा किंवा पितळेचा असतो त्यास वाजिवण्याच्या वेळेस वर सांगितल्याप्रमाणें कणीक लावितात यास बाह्या किंवा डग्गा असें ह्मणतात. पहा, ( ९ )

वाजिवणाऱ्यानें पखवाज आपल्यापुढें अडवा ठेवावा उजव्या हाताकडे शाई घातलेली बाजू करावी.

तबला वाजिवणारानें तबल्याचे दोन्ही भाग आपल्यापुढें उभे ठेवावे शाईचा भाग उजव्या हाताकडे कणकेचा भाग डाव्या हाताकडेस घ्यावा.

पखवाजाचें वाजिवणें तबल्यावर व तबल्याचें वाजिवणें पखवाजावर होतें.

# प्रकरण तिसरें.

## पखवाजाचे बोल.

पखवाजाचे दोन्ही तोंडावर दोन्ही हातांनीं बरोबर प्रहार केल्यानें किंवा वेगवेगळे प्रहार केल्यानें जो ध्वनि होतो त्यांस बोल ह्मणतात.

उजव्या हाताची बोटें व तळहात शाईकडील बाजूस ठिकठिकाणीं लागून निरनिराळे बोल होतात तसेच डाव्या हाताचेही होतात.

## बोटांचे अर्थ.

१ अंगुष्ठ ह्मणजे अंगठा, २ तर्जनी ह्म० अंगठयाचे शेजारचें बोट, ३ मध्यमिका ह्म० मधलें बोट, ४ अनामिका ह्म० करांगळी शेजारचें बोट ५ कनिष्ठिका ह्म० करांगळी.

## पखवाजावर थाप मारणें.

थाप तीन प्रकारची आहे.

प्रकार पहिला—पखवाजाचे शाईकडील बाजूवर उजव्या हाताची तर्जनी, मध्यमांगुली, अनामिका आणि कनिष्ठिका ह्या चारी बोटांचा प्रहार किनाऱ्यापासून शाईचे कांहीं भागावर बोटें पोहोंचत अशा बेतानें करून झटकर तिन्ही बोटें उचलून घेऊन कनिष्ठिकेचें शेवट शाईचे किनाऱ्यावर टेकलेलें असावें. पहा, (६)

प्रकार दुसरा—पखवाजाचे किनाऱ्यावर जें दुहेरी चामडें असतें त्याजवर अनामिका ठेऊन तर्जनी आणि मध्यमांगुली या दोन बोटांचा प्रहार शाईवर करून तीं बोटें झटकर उचलून घ्यावीं. पहा, (७)

प्रकार तिसरा—चारी बोटें व तळहात पखवाजाचे अर्ध्या तोंडावर ठेऊन सारखा हात मारावा; तो असा:— खालची अर्धी बाजू अर्ध्या शाईपर्यंत मोकळी ठेऊन हात मारून उचलून घ्यावा, परंतु तळहाताचा खालचा भाग ( करांगळीकडील बाजू ) मागाहून उचलावी. हा प्रकार फार अवघड आहे.

नकाशाकडे पूर्ण लक्ष द्यावें. पहा, (८)

## उजव्या हातानें वाजणारीं अक्षरें.

ट, र, ड, डान्, त, ता, ती, तुन्, दिन्, थुन्, न, म, त्रक्, त्रान्, नड् हीं उजव्या हातानें वाजणारीं अक्षरें आहेत.

ट, किंवा र हीं दोन अक्षरें उजव्या हाताच्या तर्जनीनें शाईवर दाबून प्रहार करून वाजवावीं, म्हणजे झटकर उचलू नयेत. पहा, (९)

ड, मध्यमांगुली, अनामिका आणि कनिष्ठिका या तिन्ही बोटांचा प्रहार शाईवर दाबून करावा. पहा, (१०)

डान्, मध्यमांगुली अनामिका आणि कनिष्ठिका या तिन्ही बोटांचा प्रहार शाईवर करून, तीं बोटें झटकर उचलून घ्यावीं. पहा, (११)

त, ता, ती, हीं अक्षरें ड प्रमाणें म्हणजे (१०) प्रमाणेंच वाजवावीं. परंतु एखादे वेळीं त ता किंवा ती हीं अक्षरें वाजीवण्याचे वेळीं अनामिका पखवाजाचे किनाऱ्यावर ठेऊन, तर्जनीनें किनारा आणि शाई यांचे मध्यभागीं प्रहार करावा लागतो. पहा, (१२)

ता हें अक्षर ज्या ठिकाणीं येईल त्या ठिकाणीं वर लिहिलेल्या तिन्हीथापांपैकीं कोणतीही एक थाप वाजवावी.

तुन्, तर्जनी शाई वर मारून उचलून घ्यावी पहा, (१३)

न किंवा म, अनामिका किनाऱ्यावर ठेऊन तर्जनी किनाऱ्यावर मारावी. पहा, (१४)

त्र, मध्यमांगुली अनामिका आणि कनिष्ठिका हीं तिन्ही

बोटें शाईवर मारून लागलेंच तर्जनी हें बोट शाईवर त्यांचे पाठोपाठ मारावें. पहा, (१५)

परंतु त्र याच्या शेजारींच जर क हें अक्षर आलें तर याचा उच्चार त्रक् असा होतो, तेव्हां क हें अक्षर डाव्या हातानें वाजविण्याचें आहे परंतु जलद वाजविण्याचे वेळेस वर लिहिल्याप्रमाणें त्र हें अक्षर वाजवून मध्यमांगुली अनामिका आणि कनिष्ठिका ह्या तिन्ही बोटांचा प्रहार लागलाच ड अक्षराप्रमाणें करावा. अशा प्रकारचा एक त्रक् वाजवीत असतात. पहा. (१६)

त्रान्, मध्यमांगुली, अनामिका, कनिष्ठिका हीं तिन्ही बोटें किनाऱ्यावर मारून लागलेंच तर्जनी हें बोट किनाऱ्यावर मारावें. पहा, (१७)

दिन्, थुन्, चारी बोटें व तळहातापैकीं कांहीं भाग अर्ध्या शाईवर पोहोंचे इतका सारखा मारून झट्कर उचलून घ्यावा. पहा. (१८)

नङ्, तर्जनीच्या शेवटाचा प्रहार किनाऱ्यावर ह्मणजे दुहेरी चापडें असतें त्याजवर करावा. पहा, (१९)

न हें अक्षर ज्या प्रमाणें वाजवावें असें लिहिलें आहे त्याप्रमाणेंच न वर्गांतील सर्व अक्षरें ( न ना नी नू ने नौ नं नः ) वाजवावीं.

याचप्रमाणें जीं अक्षरें वर लिहिलीं आहेत त्या प्रत्येक अक्षराच्या वर्गांतील कोणतेंही अक्षर तोंडानें ह्मणण्यांत आलें तरी वाजविण्यांत त्या वर्गाचें आद्य अक्षर लिहिलें आहे त्या प्रमाणेंच त्या वर्गांतील सर्व अक्षरें वाजवावीं. जेथें मुद्दाम एकाच वर्गांतील निरनिराळीं अक्षरें ( ता ता ती ) अशीं लिहि-

लीं आहेत तीं मात्र निरनिराळ्या तऱ्हेनें वर सांगितल्याप्र-
माणें वाजवावीं.

## डाव्या हातानें वाजणारीं अक्षरें.

क, ग, घ, हीं डाव्या हातानें वाजणारीं अक्षरें आहेत.

क, तर्जनी, मध्यमिका, अनामिका आणि कनिष्ठिका ह्या चारी बोटांचा प्रहार ज्या ठिकाणीं कणीक लाविलेली असते त्यावर दाबून करावा. बोटें झटकर उचलून घेऊं नयेत. पहा,(२०)

ग, या अक्षराचा प्रहार .(२०) प्रमाणें करावा.

घ, तर्जनी, मध्यमिका, अनामिका व कनिष्ठिका या चारी बोटांचा प्रहार किनाऱ्यापासून कणकेपर्यंत करून बोटें झटकर उचलून घ्यावीं. पहा (२१)

उजव्या आणि डाव्या हातांनीं एकदम वाजणारीं अक्षरें.

ध, धा, धी, धुम्, धोम्, हीं अक्षरें उजव्या व डव्या हातांनीं एकदम वाजणारीं आहेत.

ध, धी, डाव्या हाताच्या चारी बोटांचा प्रहार बोटें किनाऱ्यापासून कणकेवर पोहोंचत अशा बेतानें करून तीं बोटें उचलून घ्यावीं आणि याचे बरोबरच उजव्या हाताची अनामिका किनाऱ्यावर ठेऊन तर्जनीनें शाईवर प्रहार करून तें बोट उचलून घ्यावें हे दोन्ही हातांचे प्रहार एकदम झाले पाहिजेत. पहा, (२२)

धा, या अक्षराचा प्रहार डाव्या हातानें (२२) यांत सांगितल्या प्रमाणें करावा आणि उजव्या हातानें तीन

प्रकारच्या थापांपैकीं कोणती तरी एक थाप मारावी. हे दोन्ही प्रहार बरोबर झाले पाहिजेत.

गतीच्या वाजिवण्याचे वेळेस धा हें अक्षर आलें तर पहिल्या व दुसऱ्या प्रकारच्या थापांपैकीं कोणतीही थाप मारावी. धृपदाचें वाजविणें असले तर तिसऱ्या प्रकारची थाप मारावी.

धुम्, धोम्, डाव्या हाताचा प्रहार (२१) प्रमाणें करावा आणि उजव्या हाताचाही त्याचप्रमाणें ह्मणजे तर्जनी, मध्यमांगुली, अनामिका आणि कनिष्ठिका ह्या चारी बोटांचा प्रहार अर्ध्या शाईवर बोटें पोहोंचत अशा बेतानें करून बोटें उचलून घ्यावीं.

हे वर लिहिलेले सर्व बोल हातानें चांगले वाजवितां येऊन ध्यानांत राहिल्या खेरीज शिकणारानें खालीं लिहिलेल्या गतींचा अभ्यास करूं नये.

# प्रकरण चवथें.

पखवाजाचें वाजिवण्यांत दोन प्रकार आहेत, गतीचें वाजिवणें व धृपदाचें वाजिवणें. गतीचे वाजिवण्यास ठेक्यानें वाजिवणें असेंही ह्मणतात. धृपदाचे वाजिवण्यांत उजव्या डाव्या हातांचे जे वर बोल सांगितले आहेत त्याप्रमाणें वाजवावे, परंतु जे वर थापेचे तीन प्रकार सांगितले आहेत त्यांतील तिसऱ्या प्रकारचे थापेचा उपयोग बहुतकरून करावा.

गतीचे वाजिवण्याचे वेळेस डाव्या हातानें जे बोल वाजिवण्यांत येतात त्यांत डाव्या हाताच्या पंज्यामध्यें पोकळी ठेऊ

वाजवितात; ह्मणजे पखवाजाचे डाव्या हाताकडील बाजूचे किनाऱ्यावर जें दुहेरी चामडें असतें त्याचे पुढे व कणकेचे अलिकडेस डाव्या हाताचें मणगट ठेवून कणकेचे बाहेर आणि पलिकडील किनाऱ्याचे आंत तर्जनी मध्यमिका आणि अनामिका या तीन बोटांचे शेवटांचा प्रहार करावा लागतो. पहा, ( २३ )

त्यांत ज्या ज्या ठिकाणीं बोटांचा प्रहार करून झटकर उचलून घ्यावा ह्मणून वर सांगितलें आहे त्या त्या ठिकाणीं मध्यमांगुलीचे शेवटाचा प्रहार पंज्यांत पोकळी ठेवून करावा, आणि ज्या ठिकाणीं मणगट टेकलें आहे त्या ठिकाणीं कातडें दाबावें. पहा, ( २४ )

ज्या ज्या ठिकाणीं डाव्या हाताचीं बोटें मारून झटकर उचलूं नये असें सांगितलें आहे त्या ठिकाणीं डाव्या हाताचे तिन्ही बोटांच्या शेवटांचा प्रहार करून झटकर उचलूं नये. पहा (२५), किंवा तिनही बोटांपैकीं कोणत्याही बोटाचा प्रहार केला तरी चिंता नाहीं.

## चतस्र जातीचे त्रिपुटतालाच्या गति.

यास तिताला किंवा त्रिवट किंवा आध्धा ह्मणतात. याच्या गति पुष्कळ प्रकारच्या आहेत. त्या अशा --

ना, धी, धी, ना, हीं चार अक्षरें मिळून गतीचा एक चतुर्थांश होय; असें चार वेळ वाजिवलें ह्मणजे एक पूर्णांक होतो, ह्मणजे एक वेळ सर्व गत वाजवावयाची झाली असें

समजावें, यासच एक अवर्त ह्मणतात. त्यांत तीन वेळ ना धी धी ना वाजवावें व एक वेळ मध्यें ना ती ती ना असें वाजवावें मिळून चार वेळ वाजवावें, जसें:—

**ना** धी धी ना, **ना** धी धी ना, ना ती ती ना, **ना** धी धी ना.
— — ० —

या गतीच्या अक्षरांचा आरंभ समेच्या ठोक्यापासून आहे व अक्षरें सोळा आहेत तीं सारख्या अंतरानें वाजवावीं.

गत वाजिवण्याचा अभ्यास करते वेळेस गतीच्या ज्या अक्षराखालीं तालाच्या ठोक्याच्या निशाण्या केल्या आहेत तें अक्षर-हातानें वाजिवतांना पायानें ताल धरीत जावा. ज्या अक्षराखालीं शून्य आहे त्या ठिकाणीं काल आहे असें समजून पायानें ताल धरूं नये, ह्मणजे ठोका वाजवूं नये, आणि हा ताल धरण्याची रीति पहिल्या प्रकरणांत चतस्र जातीचा त्रिपुट ताल याचा अर्थ सांगून हातानें ताल धरण्यास सांगितलें आहे त्या प्रमाणें येथें पायानें ताल धरीत जावा, व प्रत्येक अक्षर वाजिवण्याचा अर्थ लिहिला आहे त्या प्रमाणें अक्षरें वाजवीत जावीं.

या गतीचीं अक्षरें तोंडानें ह्मणतांना कोणी ना धिं धिं ना ह्मणजे धीवर अनुस्वार देऊन ह्मणतात परंतु त्या पासून अक्षरें वाजविण्यांत किंवा दीर्घ ऱ्हस्व यांत फेरफार होत नाहीं.

## या गतीचा दुसरा पर्याय.

ज्या वेळेस हा ताल जलद धरितात त्या वेळेस ही गत फि-

रवून वाजवितात, ह्मणजे या गतीच्या सोळा अक्षरांतील चार अक्षरें कमी करितात. तीं अशीं—

ना धी धी ना, या चतुर्थांशांतील पहिलें अक्षर ना हें कमी करून तीन अक्षरें धि धीं ना हीं ठेविलीं आहेत. आणि यांत दुसरी धी जीवर अनुस्वार आहे ती दीर्घ तोंडानें ह्मणावी व हातानें वाजवावी ह्मणजे ती धी वाजिवण्यांत जास्ती एक अक्षराचा अवकाश जाऊं द्यावा आणि तीनवेळ धि धि ना व एकवेळ ति ति ना असें वाजावावें, तें खालीं लिहिल्या प्रमाणें:—

## गत.

धी धीं ना, धी धीं ना, ती तीं ना, धी धीं ना,

यांत ज्या धीवर व तीवर अनुस्वार आहे तीं अक्षरें दीर्घ वाजवावीं ह्मणजे, एका अक्षरामध्यें दोन अक्षरांचा वेळ जाऊं द्यावा. या गतीची सम पहिल्या धीवर आहे.

वर लिहिलेल्या दोन्ही गतींचा उपयोग विशेषें करून तराणा, पदें, ठुंबरी यांबरोबर वाजविण्याचा आहे.

# चतस्रजातीचा त्रिपुट.

## पंजाबी ठेका.

धा, त क धीं धा, त क तीं ता, त क धीं धा, तकधीं

१ ॥ १ १॥
**त क धीं धा** हीं चार अक्षरें मिळून गतीचा एक चतुर्थांश होतो.

**त**, एक मात्रा; यांत एक मात्रेचा अवकाश ठेवावा.
**क**, अर्धी मात्रा; त च्या निम्मे वेळांत **क** वाजवावा ह्मणजे **क** च्या पुढचें अक्षर **धीं** हें **क** च्या पाठोपाठ वाजवावें.

**धीं**, हें अक्षर एक मात्रेचें आहे. तच्या इतक्या अवकाशानें वाजवावें.

**धा**, हें अक्षर तपेक्षां दिढीनें दीर्घ वाजवावें ह्मणजे जितका वेळ त या अक्षरास लागला त्याच्या दिढीनें **धा** या अक्षरास लावावा कारण हें अक्षर दीडमात्रेचें आहे.

वर चतस्त्र जातीचा त्रिपुट ताल सांगितला आहे, त्या ठिकाणीं ह्यातालांत चार ठोके आणि आठ मात्रा आहेत असें सांगितलें आहे. परंतु या पंजाबी ठेक्यांत **त क धीं धा**
१ ॥ १ १॥
या चार अक्षरांत चार मात्रा होतात आणि हा गतीचा एक चतुर्थांश आहे. असे चार चतुर्थांश ह्मणजे एक पूर्णांक होतो; व ठोके चार होऊन मात्रा सोळा होतात. आतां आठ मात्रांच्या ऐवजीं येथें सोळा मात्रा कां लिहिल्या अशी कोणी शंका घेईल तर ज्या ज्या ठिकाणीं एक मात्रा गणली आहे त्या त्या ठिकाणीं अर्धी मात्रा अशा हिशोबानें मोजीत गेलें ह्मणजे सर्व गतीच्या मात्रा आठ होतील. परंतु अशानें गतींच्या कांहीं अक्षरांस पाव मात्रा व कांहीं अक्षरांस पाऊण मात्रा अशा येतात, यामुळें नवीन शिकणारांस अवकाश ठेविण्याच्या समजुतींत फार अडचण पडेल ह्मणून

दुप्पट मात्रा करून ताल दर्शविला आहे.

ज्या ठिकाणीं ऱ्हस्व अक्षर वाजिवण्यांत येईल त्याचा नियम इतकाच समजला पाहिजे कीं त्या ऱ्हस्व अक्षराच्या पुढच्या अक्षराचा आरंभ जलद करावा. यावरूनच तें पाठीमागचें अक्षर ऱ्हस्व आहे असें समजतें. तोंडानें ह्मणण्यांत देखील तसाच प्रकार आहे.

जेव्हां दीर्घ अक्षर वाजवावें लागतें तेव्हां जें दीर्घ अक्षर असेल त्याच्या पुढच्या अक्षराचा आरंभ जलद न करितां जितक्या मात्रांचें तें अक्षर असेल तितक्या मात्रांचा अवकाश जाऊं देऊन नंतर करावा. याजवरूनच हें अक्षर दीर्घ आहे असें समजतें.

या गतीचा उपयोग बहुत करून पंजाबी ठुंबऱ्या बरोबर होतो.

# चतस्रजातीचा त्रिपुट.

## गत ख्यालाची.

यास तिलवाड्याचा ठेका असेंही ह्मणतात.

१ २ १ २ २<br>
धा धींऽ कि धा धी धा धीं ऽकी ता गी<br>
— — — ०

या गतीची सम पांचवें अक्षर धी याजवर आहे. पहिला ठोका व तसाच तिसरा ठोका धींवर न पडतां धीं आणि की यांच्या मधल्या अवकाशांत पडतात इकडे शिकणारानें

दक्षिण व उत्तर हिंदुस्थानांत ख्याल ह्मणून एक प्रकारची कविता आहे ती ह्मणतांना या गतीचा उपयोग होतो.

या गतीच्या बोलावर जे अंक घातले आहेत ते प्रत्येक बोलाच्या किती मात्रा आहेत हें दाखविण्याकरितां घातले आहेत. यांत ज्या ज्या अक्षरांवर एकाचा आकडा आहे तीं तीं अक्षरें एक मात्रेचीं आहेत असें समजावें. त्याच प्रमाणें ज्यांवर दोहोंचा अंक आहे तीं दोन मात्रांचीं आहेत असें समजावें व तीं वाजविण्यास एका मात्रेच्या अक्षराच्या दुप्पट वेळ घालवावा.

संस्कृत किंवा प्राकृत भाषा लिहिण्याच्या पद्धतीप्रमाणें धा हें अक्षर दीर्घच समजलें पाहिजे परंतु पखवाजाचे बोल किंवा गतींचीं अक्षरें लिहिण्यांत हा नियम बिनकूल लागू नाहीं. कारण यांत कोणतें अक्षर कोणतेवेळीं ऱ्हस्व होईल याचा नियम नाहीं.

## ख्यालाची गत दुसरी.

१॥ ॥ १ १ १ १ १ ॥॥ १॥ ॥ १ १ १ १ १ ॥ ॥

**धा घी ना घी धीं धीं धा तृक धा घी ना घी तीं तीं ता तृक**

— — — —

या गतीची सम सातव्या, धा वर आहे.

## चतस्रजातीचा त्रिपुट

कथेच्या आरंभाची, लावणीची व भजनाची गत

१ १ १ १ १ १ ॥ ॥ ॥ ॥

**धीं धीं ना तीं ना धीं ना गी तृ क**

— — — —

या गतीची सम पहिल्या धीं वर आहे.

## वरील गतीचा दुसरा पर्याय.

१ ॥ १ ॥ ॥ ॥ १ ॥ १ ॥ ॥ ॥
धीं न धीऽ घ्धी न क तीं न धीऽघ्धी न क
— — ० —

या गतीच्या अक्षरांखालीं तालाच्या ठोक्यांच्या निशाण्या घातल्या आहेत त्यांत समेचा ठोका पहिल्या धी खालीं आला आहे व कालाचा ठोका तीं खालीं आला आहे. दुसरा आणि चवथा असे दोन ठोके धी घ्धी या दोन अक्षरांच्या मधल्या अवकाशांत आहेत ह्मणून तोंडानें ह्मणते वेळेस किंवा हातानें गत वाजिवते वेळेस ह्या दोन अक्षरांच्या मधल्या अवकाशांत ठोके टाकावे.

## वरील गतीचा तिसरा पर्याय

धींनकत्ऽधीनक धींनकत्ऽधीनक
— — ० —

या गतींत समेचा ठोका पहिल्या धींवर आहे. दुसरा व चवथा असे दोन ठोके त, व धी यांचे मधल्या अवकाशांत पडतात.

या गतींतील त् या अक्षराचा वाजविण्यांत उपयोग करूं नये फक्त तोंडानें बोलण्याचे वेळेस करावा. वाजविण्यांत उपयोग केला तर गतीमध्यें गडबड होऊन गत चांगली दिसत नाहीं.

# चतस्त्रजातीचा त्रिपुट.

## गत टप्याची.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | | |
| धा | घी | धा | घी | हीं अक्षरें गतीचा एक चतुर्थांश होय. |
| १॥ | ॥ | १ | १ | |

या गतीची सम चवथे अक्षर धी याचेवर आहे.

| | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ |
| धा | घी | धा | घी | धा | घी | धा | घी | धा | धा | घी | धा | ता | गी | ता | गी |
| १॥ | ॥ | १ | १ | १॥ | ॥ | १ | १ | १॥ | ॥ | १ | १ | १॥ | ॥ | १ | १ |
| | | | — | | | | — | | | | ० | | | | — |

गतीच्या अक्षरांखालीं मात्रांच्या निशाण्या केल्या आहेत. त्या प्रमाणें वाजिवण्यांत दीर्घ ऱ्हस्व अक्षरें ठेवावीं.

या गतीचा उपयोग विशेषें करून टप्पा गाण्याबरोबर होतो

## रूपक किंवा एका या तालाच्या गति.

### एका

| | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ |
| धी | धी | धा | तू | क | तू | ना | क | त्ता | धी | तू | क | धी | ना |
| १ | १ | १ | ॥ | ॥ | १ | १ | १ | १ | १ | ॥ | ॥ | १ | १ |
| — | | — | | | ० | | — | | — | | | ० | |

या गतीची सम पहिल्या घी[२] वर आहे आणि ४।५।११। १२ हीं अक्षरें अर्ध मात्रेची आहेत व बाकीं अक्षरें एक मात्रेचीं आहेत.

या गतींत तालाची दोन आवर्त्तें होतात तेव्हां एकदां गत

